**प्रकल्प संचालक, पु.ल.देशपांडे महाराष्ट्र कला अकादमी, मुंबई यांच्या आस्थापनेवरील अस्थायी पदे पुढे चालू ठेवण्याबाबत...**

**महाराष्ट्र शासन**
**पर्यटन व सांस्कृतिक कार्य विभाग**
**शासन निर्णय क्रमांक: पुलदे - २०२०/ प्र.क्र.३७/सांका.-२.**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरू चौक, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
दिनांक :- ०४ मार्च, २०२०.

संदर्भ : १. वित्त विभाग शासन निर्णय क्र. असंक-१००४/प्र.क्र. १२(भाग-२)/२००४/वित्तीय सुधारणा-१, दि. ४.१०.२००४.
२. समाज कल्याण, सांस्कृतिक कार्य, क्रिडा व विशेष सहाय्य विभाग क्र. संकीर्ण-२००१/प्र.क्र. २९८/सां.का.२, दि. २३.३.२००६.
३. वित्त विभाग शासन निर्णय क्र. पदनि २०१६/प्र.क्र.८/१६/आ.पु.क. दि. ११.०९.२०१९.
४. पर्यटन व सांस्कृतिक कार्य विभाग शासन निर्णय क्र. पुलदे-२०१८/प्र.क्र.१३/सां.का.२, दि. २३.०९.२०१९.
५. प्रकल्प संचालक, पु.ल.देशपांडे महाराष्ट्र कला अकादमी, मुंबई यांचे पत्र क्र. पुलदे-२३३०, दि. २६.०२.२०२०.
६. वित्त विभाग शासन निर्णय क्र. पदनि २०१६/प्र.क्र.८/१६/आ.पु.क. दि. १२.०२.२०२०.

**शासन निर्णय :-**

या विभागाच्या प्रशासकीय नियंत्रणाखालील प्रकल्प संचालक, पु.ल.देशपांडे महाराष्ट्र कला अकादमी, मुंबई आस्थापनेवरील ०७ अस्थायी पदे दि. २९.०२.२०२० पर्यंत पुढे चालू ठेवण्यास संदर्भाधिन क्रमांक ४ येथील दि. २३.०९.२०१९ च्या शासन निर्णयानुसार मंजूरी देण्यात आली होती. आता प्रकल्प संचालक, पु.ल.देशपांडे महाराष्ट्र कला अकादमी, मुंबई यांनी संदर्भ क्र. ५ येथील पत्रान्वये त्यांच्या आस्थापनेवरील ०७ अस्थायी पदांना मुदतवाढ देण्याबाबत प्रस्ताव सादर केला आहे. संदर्भ क्र. ६ येथील शासन निर्णयानुसार वित्त विभागाने अस्थायी पदांना दि. १.०३.२०२० ते दि. ३१.०८.२०२० पर्यंत मुदतवाढ देण्याबाबत प्रशासकीय विभागास अधिकार प्रदान केले आहेत. पु.ल.देशपांडे महाराष्ट्र कला अकादमीकडून प्राप्त प्रस्तावाच्या अनुषंगाने खालील अटींच्या अधीन राहून खालील विवरणपत्रात नमूद केलेल्या ०७ अस्थायी पदांना दि. १.०३.२०२० ते दि. ३१.०८.२०२० पर्यंत पुढे चालू ठेवण्यास या शासन निर्णयान्वये मंजूरी देण्यात येत आहे :-

| अ.क्र. | पदनाम व गट | वेतनस्तर | अस्थायी पदांची संख्या |
|---|---|---|---|
| १. | वित्तीय सल्लागार, गट-अ | S-२३ रु. ६७७००-२०८७०० | १ |
| २. | लेखा अधिकारी, गट-ब | S-१६ रु. ४४९००-१४२४०० | १ |
| ३. | निम्नश्रेणी लघुलेखक, गट-क | S-१४ रु. ३८६००-१२२८०० | १ |
| ४. | संगणक चालक (करारपध्दतीने) | ---- | २ |
| ५. | भांडारपाल, गट-क | S-७ रु. २१७००-६९१०० | १ |
| ६. | रोखपाल, गट-क | S-६ रु. १९९००-६३२०० | १ |
| **एकूण** | | | **०७** |

**२.** या शासन निर्णयान्वये उपरोक्त ०७ अस्थायी पदे दि. १.०३.२०२० पासून दि. ३१.०८.२०२० पर्यंत पुढे चालू ठेवण्यास खालील अटीच्या अधीन राहून मंजूरी देण्यात येत आहे.

१) ज्या प्रयोजनार्थ ही पदे निर्माण केली आहेत त्याच प्रयोजनार्थ त्या पदाचा विनियोग करण्यात यावा.
२) या पदांपैकी कोणतेही पद सहा महिन्यांपेक्षा जास्त कालावधीसाठी रिक्त नाही.
३) या पदांवरील अपेक्षित खर्च मंजूर अनुदानातून भागविण्यात यावा.
४) वित्त विभाग शासन निर्णय दि. १२.०२.२०२० अन्वये दिलेल्या सूचनांच्या अनुषंगाने योग्य ती कार्यवाही करावी.

**३.** याबाबतचा खर्च "मागणी क्र. झेडडी-२, २२०५ कला व संस्कृती (००१) ललित कला शिक्षण (०७) (०१) पु.ल.देशपांडे महाराष्ट्र कला अकादमी, (२२०५ १४६३) ०१- वेतन या लेखाशिर्षाखाली सन २०२०-२१ या आर्थिक वर्षात मंजूर आर्थिक तरतूदीतून भागविण्यात येईल.

**४.** हा शासन निर्णय वित्त विभाग शासन निर्णय क्र. असंक-१००४/प्र.क.१२ (भाग-२)/२००४/ वित्तीय सुधाराणा-१, दि. ४.१०.२००४ व वित्त विभाग शासन निर्णय क्र. पदनि २०१६/प्र.क्र.८/१६/आ.पु.क. दि. १२.०२.२०२० अन्वये प्रशासकीय विभागाला प्रदान केलल्या अधिकारानूसार निर्गमित करण्यात येत आहे.

**५.** सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२००३०४११२६२१०८२३ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करून काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Digitally signed by Sawant Balasaheb Ishwar
Date: 2020.03.04 11:28:52 +05'30'

**( बाळासाहेब ईश्वर सावंत )**
**कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन.**

**प्रति,**

१. प्रकल्प संचालक, पु.ल.देशपांडे महाराष्ट्र कला अकादमी, मुंबई
२. महालेखापाल महाराष्ट्र-१ (लेखा व अनुज्ञेयता / लेखा परिक्षा) मुंबई.
३. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई.
४. निवासी लेखा परिक्षा अधिकारी,मुबई.
५. वित्त विभाग, मंत्रालय,मुंबई.
६. कार्यासन अधिकारी (अर्थसंकल्प.) पर्यटन व सांस्कृतिक विभाग, मंत्रालय, मुंबई.
७. निवड नस्ती.-सां.का.२.